मनोविकृती/मानसिक दुर्बलता किंवा
शारीरिकदृष्ट्या पांगळेपण/विकलांगता
असलेल्या शासकीय कर्मचा-याच्या मुलांना
संपूर्ण हयातभर कुटुंब निवृत्तिवेतन देण्याबाबत

सेवानिवृत्तीपूर्वी किंवा सेवेत असताना मृत्यू
होण्यापूर्वी उघडकीस आलेली विकलांगतेची
अट काढून टाकण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-कुनिवे-१०९०/२५४/सेवा-४,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २ जुलै १९९१.

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पीईएन-१४७२/१६०१/सीआर-२३९/७५/सेवा-४, दिनांक १२ ऑगस्ट १९७६ अन्वये असे आदेश काढण्यात आले होते की, शासकीय कर्मचा--याच्या मुलामध्ये किंवा मुलीमध्ये काही मनोविकृती किंवा मानसिक दुर्बलता निर्माण झालेली असेल किंवा शारीरिकदृष्ट्या पांगळेपणा किंवा विकलांगता आलेली असेल आणि त्यामुळे त्या मुलाच्या बाबतीत अठरा वर्षे [आता एकवीस वर्षे] आणि अविवाहीत मुलीच्या बाबतीत एकवीस वर्षे [आता चोवीस वर्षे] वय पूर्ण झालेले असले तरी त्याला/तिला उपजिविका करणे शक्य नसेल तर, अशा मुलाला किंवा अविवाहीत मुलीला, त्या शासन निर्णयात नमूद केलेल्या शर्तींच्या अधीन राहून, संपूर्ण हयातभर कुटुंब निवृत्तिवेतन प्रदेय होईल. हे आदेश दिनांक १२ ऑगस्ट १९७६ पासून अंमलात आलेले आहेत. ह्या तरतुदींचा अंतर्भाव महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्तिवेतन] नियम, १९८२ मधील नियम ११६ च्या पोटनियम [५] मध्ये करण्यात आला असून ते दिनांक १५ ऑगस्ट १९८२ पासून अंमलात आलेले आहेत. या नियमाच्या पोटनियम [५] मधील स्पष्टीकरण [ए] च्या तरतुदींनुसार शासकीय कर्मचा-याच्या सेवानिवृत्तीपूर्वी किंवा सेवेत असताना झालेल्या मृत्यूपूर्वी उघडकीस आलेली विकलांगताच फक्त कुटुंबनिवृत्तिवेतन मंजुरीसाठी विचारात घेतली जाते. या तरतुदींमुळे शासकीय कर्मचा-याच्या सेवानिवृत्तीनंतर किंवा सेवेत असताना झालेल्या मृत्यूनंतर विकलांगता निर्माण झालेली अपत्ये हयातभर कुटुंब निवृत्तिवेतनाच्या लाभासाठी अपात्र ठरत होती.

२. शासन आता असे निदेश देत आहे की, हयातभर कुटुंब निवृत्तिवेतन मंजूर करण्यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा [निवृत्तिवेतन] नियम, १९८२ च्या नियम ११६ [५] खालील स्पष्टीकरण [ए] मध्ये नमूद केलेली, शासकीय कर्मचा-याच्या सेवानिवृत्तीपूर्वी किंवा सेवेत असताना झालेल्या मृत्यूपूर्वी उघडकीस आलेली विकलांगता विचारात घेण्याची जी पूर्वअट आहे ती काढून टाकण्यात यावी.

३. शासन आणखी असाही निदेश देत आहे की, दिनांक १२ ऑगस्ट १९७६ पूर्वी

आदेशात आवश्यक ती तरतूद नसल्यामुळे किंवा दिनांक २५ ऑगस्ट १९८२ पासून वर नमूद केलेली पूर्वअट अमलात आल्यामुळे पात्र असलेल्या ज्या विकलांग अपत्यांना हा लाभ देण्यात आलेला नव्हता ते देखील आता हयातभर कुटुंब निवृत्तिवेतनाच्या लाभा-साठी पात्र राहतील. परंतु त्यासाठी अट अशी असेल की ते केंद्र शासन किंवा राज्य शासन आणि/किंवा केंद्र किंवा राज्य शासनाच्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम/स्वायत्त संस्था/स्थानिक संस्था यांच्या नियमान्वये अगोदरच कोणतेही निवृत्तिवेतन घेत नसावेत किंवा पात्र नसावेत.

४. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील. परिच्छेद ३ मध्ये नमूद केलेल्या प्रकरणानाही त्याच दिनांकापासून लागू राहतील.

५. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अ. ना. कुळकर्णी,
शासनाचे उप सचिव.

प्रति

महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] १, महाराष्ट्र, मुंबई [८० प्रती].
महालेखापाल [लेखा परीक्षा] १, महाराष्ट्र, मुंबई [८० प्रती].
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता] २, महाराष्ट्र, नागपूर [४० प्रती].
महालेखापाल [लेखा परीक्षा] २, महाराष्ट्र, नागपूर [४० प्रती].
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई [४० प्रती].
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई [५ प्रती].
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्य मंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
x प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
x प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
x प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
मंत्रालयातील सर्व विभाग.
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.
वित्त विभागातील सर्व कार्यासने [ग्रंथपाल ५ प्रती].
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

ए७-१७७[४] [१३,०००+ १५-७-९१]-१३

Family Pension for life to children suffering from disorder/disability of mind or are physically crippled/ disabled —

Discontinuance of the condition of manifestation of the disability before retirement or death in harness of the Government servant for grant of —

GOVERNMENT OF MAHARASHTRA,
Finance Department,
Government Resolution No.PEN-1090/254/SER-4,
Mantralaya, Bombay 400 032, dated the 2nd July 1991.

## RESOLUTION

By Government Resolution, Finance Department No.PEN-1472/1609/ CR-239/75/SER-4, dated the 12th August 1976 orders were issued to the effect that if the son or daughter of a Government servant is suffering from any disorder or disability of mind or is physically crippled or disabled so as to render him or her unable to earn a living even after attaining the age of 18 years (now 21 years) in the case of a son and 21 years (now 24 years) in the case of an unmarried daughter, the family pension shall be payable to such son or unmarried daughter for life, subject to the conditions laid down therein. These orders came into effect from 12th August 1976. These orders have since been incorporated in sub-rule (5) of rule 116 of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 which came into force from 15th August, 1982. Under Explanation (a) in Sub-rule (5) it was further provided that disability which manifests itself before the retirement or death of the Government servant while in service shall be taken into account for the purpose of grant of Family Pension. This made the children who acquire the disability subsequent to the retirement/death in harness of the Government servant ineligible for the grant of the benefit of life time payment of family pension.

2. Government is now pleased to decide that the requirement of manifestation of the disability before the retirement/death in harness of the Government servant as a pre-condition for the grant of life-time family pension, as stipulated in the Explanation (a) in rule 116(5) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982 should be dispensed with.

3. Government is also pleased to decide that the eligible disabled children who were not granted this benefit in the absence of necessary provision in the Orders prior to 12th August 1976 or due to the operation of the aforesaid restriction from 15th August 1982 should also now be held eligible for the benefit of lifetime payment of family pension. This is subject to their being not in receipt of any pension or being eligible therefor under any other rules of the Central Government or a State Government and/or a Public Sector Undertaking/Autonomous Body/Local Authority under the Central or a State Government.

4. These orders take effect from the date of issue, including in respect of the past cases referred to in paragraph-3 above.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A.N. KULKARNI,
Deputy Secretary to Government.

1-134(A)(13,000+15_7_91)-2a.